राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत सन
२००९-१० मध्ये कृषि व संलग्न क्षेत्रांशी
संबंधित प्रकल्पांना मान्यता देण्याबाबत
कृषि व पदुम विभाग(कृषि विभाग)

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्र. राकृवि-२००९/प्र.क्र.७८/राकृवियो कक्ष,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :१ ऑगस्ट, २००९

**वाचा :-** १) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक समिती-२००७/प्र.क्र.१/राकृवियो, दि.२०/९/२००७
२) कृषि व पदुम विभाग पत्र क्रमांक आरकेव्ही-१००९/प्र.क्र.१९/आरकेव्हीवाय, दि.२९/६/२००९

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने कृषि व संलग्न क्षेत्राच्या विकास दरात वाढ करण्याकरिता अकराव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत राष्ट्रीय कृषि विकास योजना हा कार्यक्रम राबविण्यास सन २००७-०८ पासून सुरुवात केली आहे. या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीतून पायाभूत सुविधा तसेच वैयक्तिक लाभार्थीकरिता प्रकल्प राबविले जातात. या प्रकल्पांना मंजुरी देण्याकरिता केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांच्या अध्यक्षतेखाली "राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समिती" गठीत करण्यात आली आहे. सदरहू समितीने दिनांक ११ जून,२००९ च्या बैठकीत मंजूर केलेल्या प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त पार्श्वभूमीवर शासन, **राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समिती**ने शिफारस केलेल्या खालील प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता देत आहे :

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | अंमलबजावणी अधिकारी | रक्कम (रुपये कोटीत) |
|---|---|---|---|
| १ | **कोकण विभागात जलकुंभ योजना** | **आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे** | **४०.००** |
| २ | **Quality Control Laboratories & Residue Testing Laboratory** | **--- " ---** | **१०.००** |
| | | **एकूण** | **५०.००** |

२. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पांच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग व अंमलबजावणी यंत्रणेस खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

१) यापूर्वी विविध प्रकल्पांना वितरित केलेल्या निधीच्या खर्चाची सविस्तर माहिती आणि विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र **आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे** यांनी प्रथम सादर करावीत. प्रकल्पांवर करण्यात आलेल्या खर्चाची अद्ययावत माहिती आणि उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या प्रकल्पांना सन २००९-१० मध्ये निधी वितरित केला जाणार नाही.

२) यापूर्वी मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पांचा भौतिक व वित्तीय प्रगती अहवाल आणि उर्वरित कार्यक्रमाचे नियोजन याबाबतची माहिती **आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे** यांनी सादर करावी.

३) सन २००९-१० या वर्षात उपरोक्त योजना नव्याने राबविल्या जात असतील तर त्यासाठी आवश्यक असलेला निधी, त्याकरिता करण्यात आलेल्या कामाचे नियोजन याबाबतच्या निश्चित प्रस्तावास प्रशासकीय व तांत्रिक मान्यता द्यावी.

४) सन २००९-१० मध्ये मंजूर प्रकल्पावर किती निधी खर्च करणे शक्य आहे याचा आढावा घेऊन त्यानुसार निधी वितरणाकरिता आवश्यक तो प्रस्ताव या विभागाकडे सादर करावा.

५) मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पांना केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निधीच्या उपलब्धतेनुसार निधी वितरित केला जाईल.

६) या प्रकल्पांची अंमलबजावणी करण्याकरिता आवश्यक ती सविस्तर कार्यप्रणाली/मार्गदर्शक सूचना कृषि विभागाने विहित कराव्यात.

७) सदर निधी "राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समिती" च्या दिनांक ११/६/२००९ च्या बैठकीतील निर्णय व या योजनेसंबंधीच्या केंद्र शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन खर्च करावा.

८) प्रकल्प राबवितांना त्यांची अंमलबजावणी, सनियंत्रण आणि मुल्यमापन करण्यासंदर्भात आवश्यक तो समन्वय संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने राष्ट्रीय कृषि विकास योजनेचे समन्वयक म्हणून संचालक (प्रक्रिया व निर्यातक्षम शेती), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे व कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य छोटया शेतकऱ्यांचा कृषि व्यापार संघ, पुणे यांच्याशी ठेवावा.

९) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य छोटया शेतकऱ्यांचा कृषि व्यापार संघ, पुणे यांनी या योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी व त्याचा विनियोग याबाबतचा हिशोब स्वतंत्रपणे विहित केलेल्या लेखा पध्दतीनुसार ठेवावा. तसेच सदरहू लेख्यांचे लेखा परिक्षण महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई यांच्याकडून करुन घ्यावे.

१०) **आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे** यांनीया योजनेबाबतचा अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास सादर करावीत.

११) **आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे** यांनी मंजूर करण्यात आलेला निधी दि. ३१ मार्च, २०१० पूर्वी उपयोगात आणावा.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२००९०८०४१३१२३५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(ग. शा. सोनावणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

प्रधान सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव ( कृषि विभाग) ),कृषि व पदुम विभाग,मुंबई-३२
प्रधान सचिव ( जलसंधारण विभाग) ग्राम विकास व जलसंधारण विभाग मुंबई-३२
आयुक्त ( कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक (मृद संधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक (प्रक्रिया व व्यापारक्षम शेती)/उपसंचालक (राकृवियो), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य छोट्या शेतकऱ्यांचा कृषि व्यापार संघ, पुणे
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी / सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व विभागीय कृषि सहसंचालक / सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
महालेखापाल (लेखा परिक्षा) ,महाराष्ट्र १, मुंबई / महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
निवड नस्ती